**नटवर्य प्रभाकर पणशीकर रंगभूमी जीवन गौरव पुरस्कार सन २०१८-२०१९ जाहीर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. रंजीपु १५१८/प्र.क्र.३२७/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्र. सांकासं २००५/प्र.क्र. ३८८/सां.का.३, दि. २ मार्च, २००६
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. पूरक - २०११/प्र.क्र. १५०/सां.का.४, दिनांक १३ एप्रिल, २०१२

**प्रस्तावना :-**

रंगभूमीवर उत्कृष्ट कामगिरी केलेल्या ज्येष्ठ नाट्यकलाकारास नटवर्य प्रभाकर पणशीकर यांच्या नांवे पुरस्कार देऊन गौरव करण्याची योजना उपनिर्दिष्ट दिनांक २ मार्च, २००६ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आलेली आहे. या पुरस्काराचे स्वरुप रुपये ५.०० लाख व मानचिन्ह असे आहे.

सन २०१८-१९ या वर्षीच्या नटवर्य प्रभाकर पणशीकर रंगभूमी जीवन गौरव पुरस्कार निवडीसाठी निवड समितीची बैठक मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २९ ऑक्टोबर, २०१८ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत मान्यवरांनी केलेल्या शिफारशीनुसार नटवर्य प्रभाकर पणशीकर रंगभूमी जीवन गौरव पुरस्कार सन २०१८-२०१९ जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-२०१९ या वर्षासाठी नटवर्य प्रभाकर पणशीकर रंगभूमी जीवन गौरव हा पुरस्कार **श्री. जयंत सावरकर** यांना जाहीर करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१२०४१५२५२१७२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2018.12.04 15:29:47 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत आवश्यक त्या कार्यवाहीसाठी,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव

३. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य), यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२
५. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२
६. उप सचिव (सां.का. ४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२
७. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
८. महालेखापाल (महाराष्ट्र-१/२) (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवड नस्ती, सां.का.४.